**विधानसभा निवडणूक सन २०२४ करिता अपर पोलीस आयुक्त, मोटार परिवहन विभाग, नागपाडा, मुंबई यांनी बंदोबस्ताकरिता भाडेतत्वावर अधिग्रहित केलेल्या वाहनांच्या भाड्यापोटी देय असलेले रु. ४,०९,४१,५०३/- (अक्षरी रु. चार कोटी नऊ लाख एक्केचाळीस हजार पाचशे तीन ) इतकी रक्कम अदा करण्याच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-०३२५/प्र.क्र.१७/विशा-१ अ**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक : २५ एप्रिल, २०२५**

**वाचा :-** १) पोलीस सह आयुक्त(प्रशासन), बृहन्मुंबई यांचे पत्र जा.क्र. १६४/CP/D-६/(MOD)/TMK/ २०२५, दि. २७/०३/२०२५

२) पोलीस उप आयुक्त (१), मोटार परिवहन विभाग, मुंबई यांचे पत्र जा.क्र.२४/पोउआ/ निवडणूक कक्ष/मोपवि/२०२५, दिनांक १४/०२/२०२५

**प्रस्तावना :-**

अपर पोलीस आयुक्त, मोटार परिवहन विभाग, नागपाडा, मुंबई यांनी सार्वत्रिक विधानसभा निवडणूक सन २०२४ मध्ये बृहन्मुंबईमध्ये कायदा व सुव्यवस्था राखणेकामी CAPF / SAP च्या आलेल्या १९ कंपन्यांना बंदोबस्त कालावधीदरम्यान विविध ठिकाणाहून ने-आण करण्याकरिता ५० आसनी बस, ट्रक, टेम्पो, वातानुकूलित व साध्या जीप अशी वाहने अधिग्रहित करण्यात आली होती. सदर अग्रिहित केलेल्या वाहनांच्या भाड्यापोटी एकूण रु. ४,०९,४१,५०३/-(अक्षरी रु. चार कोटी नऊ लाख एक्केचाळीस हजार पाचशे तीन ) इतकी देय रक्कम अदा करण्याच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

अपर पोलीस आयुक्त, मोटार परिवहन विभाग, नागपाडा, मुंबई यांनी सार्वत्रिक विधानसभा निवडणूक सन २०२४ मध्ये बृहन्मुंबईमध्ये कायदा व सुव्यवस्था राखणेकामी CAPF / SAP च्या आलेल्या १९ कंपन्यांना बंदोबस्त कालावधीदरम्यान विविध ठिकाणाहून ने-आण करण्याकरिता ५० आसनी बस, ट्रक, टेम्पो, वातानुकूलित व साध्या जीप अशी वाहने अधिग्रहित करण्यात आली होती. सदर अधिग्रहित केलेल्या वाहनांच्या भाड्यापोटी एकूण रु. ४,०९,४१,५०३/- (अक्षरी रु. चार कोटी नऊ लाख एक्केचाळीस हजार पाचशे तीन ) इतकी देय रक्कम अदा करण्याच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

सदरचा खर्च “मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस (०२) १०८ राज्य मुख्यालय पोलीस (०२) शहर पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना (अनिवार्य) (२०५५ ००९७) ५०- इतर खर्च ” या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०२५-२६ च्या उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

वरील वाहनांच्या भाड्यापोटी प्राप्त होणाऱ्या देयकांची छाननी करुन ती योग्य असल्याची खातरजमा करण्यात आल्यानंतर सदर देयक अदा करण्यात यावीत.

सदरचा निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी अपर पोलीस आयुक्त, मोटार परिवहन विभाग, नागपाडा, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" आणि प्रशासकीय अधिकारी, मोटार परिवहन विभाग, नागपाडा, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमावली, १९७८, भाग-१, उपविभाग-२, अनुक्रमांक-१३, नियम क्र. ६० व ६१ अन्वये तसेच वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग-१ मधील अनुक्रमांक ६, नियम-४० अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या पूर्ण अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०४२५११२९२६८८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत  करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

HEMANT ANANT MAHAJAN

Digitally signed by HEMANT ANANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=18b72890e049ba3219e993bae40e4fae87fba16fd8c92cbf7f96107d9c100ae1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4146B85AAA58555E80C9D75A2ABA23B993E46DF208B0B469F1B74670DC22D7FA, cn=HEMANT ANANT MAHAJAN
Date: 2025.04.25 12:08:32 +05'30'

**( हेमंत महाजन )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
२) पोलीस उप आयुक्त (१), मोटार परिवहन विभाग, मुंबई
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा व परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
६) निवडनस्ती (कार्यासन विशा-१अ)